यवतमाळ येथे वन भवन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. ईएसटी २०१४/प्र.क्र. २६१/फ-९**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक :- ५ ऑक्टोबर, २०१५**

वाचा :- १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४ (३)/२६६/२०१२-१३, दिनांक ६/७/२०१२

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक ईएसटी-२०१२/प्र.क्र. २६३/फ-९, दिनांक २.२.२०१३

प्रस्तावना :-

यवतमाळ वनवृत्ताअतंर्गत वृत्तस्तरावर मुख्यालय असलेल्या सर्व वनविभागाची कार्यालये एकाच ठिकाणी राहण्याच्या उददेशाने यवतमाळ येथे वन भवन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या बांधकाम अवस्था-१ साठी रु.९,१३,८९,८४५/- इतक्या रकमेस संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. या प्रशासकीय इमारतीचे बांधकाम रू. ५.०० कोटीपेक्षा जास्त असल्याने, सचिव समितीची मान्यता क्रमप्राप्त होते. त्यानुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाने यवतमाळ येथे वन भवन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाच्या बांधकाम अवस्था-१ चा प्रस्ताव सचिव समितीसमोर दिनांक ८.९.२०१५ रोजी ठेवण्यात आला. त्यामुळे, यापूर्वी संदर्भाधीन दिनांक २.२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेले प्रशासकीय मान्यतेचे आदेश रद्द करण्यात येवून, पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

यवतमाळ येथे वन भवन प्रशासकीय कार्यालयाच्या इमारतीच्या बांधकाम अवस्था-१ साठी रू. ९०९.०० लक्ष इतक्या निधीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास, सार्वजनिक बांधकाम विभागाने नमुद केलेल्या अटीच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता **(वित्तीय मान्यता वगळून)** देण्यात येत आहे :-

अ) प्रस्तुत इमारतीच्या कामासाठी वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून वास्तुमांडणी, नकाशा व इमारतीचा सविस्तर नकाशा तयार करुन त्यास मंजूरी घेतल्यावरच सुरु करावे.

ब) काम सुरु करण्यापुर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

क) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजुर करुनच काम हाती घ्यावे.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र. ७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४०/इमारत, दिनांक १.१०.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००५१७२९४२२८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.10.05 17:30:03 +05'30'

( वीरेन्द्र तिवारी )

**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण/संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) यवतमाळ.
५. महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०.फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.(निवडनस्ती).